महाराष्ट्र शासन

**क्रमांक: बीयुडी-१६२४/प्र.क्र.८६/विमान-२**
**सामान्य प्रशासन विभाग,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई -४०० ०३२
दिनांक : ४ मार्च, २०२५

**विषय :- राज्यातील विमानतळांच्या विकासाकरीता महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस निधी वितरीत करणेबाबत.**

**वाचा**:- १. वित्त विभागाचे परिपत्रक, क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४.
२. वित्त विभागाचे परिपत्रक, क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३,दि.२५.०७.२०२४.
३. विभागाचे समक्रमांकाचे शासन ज्ञापन दि. २६.०८.२०२४.
४. वित्त विभागाचे परिपत्रक, क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.१२.०२.२०२५.
५. उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी, मुंबई यांचे पत्र क्र.मविविकं/२०२४/वित्त व लेखा/१४११, दि.२४.१२.२०२४. व टिप्पणी दि.२७.०२.२०२५

**<u>शासन ज्ञापन</u>** :-

राज्यातील विमानतळांच्या विकासासाठी लेखाशिर्ष ३०५३ ०१६४ खाली निधी उपलब्ध करून देण्यात येतो. सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता सदर लेखाशिर्षाखाली रु.४५५.०० कोटी (रू. चारशे पंचावन्न कोटी फक्त) इतकी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आली आहे.

अर्थसंकल्पीय तरतूदीमधून वित्त विभागाच्या मान्यतेने राज्यातील विमानतळांच्या विकासासाठी लेखाशीर्ष ३०५३ ०१६४ खाली रु.६८.२५ कोटी (रू. अडुसष्ट कोटी पंचवीस लक्ष फक्त) इतका निधी महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस दि.२६ ऑगस्ट, २०२४ रोजीच्या शासन ज्ञापनान्वये वितरीत केला आहे. उर्वरीत अर्थसंकल्पीय तरतूदीमधून वित्त विभागाने राज्यातील विमानतळांच्या विकासासाठी लेखाशीर्ष ३०५३ ०१६४ खाली रु.१००.०० कोटी (रू. शंभर कोटी फक्त) इतका निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (बिम्स प्रणाली) वितरीत केला आहे. सदर निधी महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीने केलेल्या मागणीनुसार राज्यातील विमानतळांच्या विकासासाठी खालील तक्त्यातील स्तंभ क्र. १ मधील कामासाठी, स्तंभ क्र. २ मधील विमानतळासाठी स्तंभ क्र.४ मध्ये दर्शविल्याप्रमाणे महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीला एकुण रू.१००.०० (रू. शंभर कोटी ) निधी वितरीत करण्यास या शासन ज्ञापनान्वये मान्यता देण्यात येत आहे.

**( रूपये कोटीत )**

| | विमानतळाचे नाव | आतापर्यंत विमानतळाला वितरीत निधी | या शासन ज्ञापनान्वये वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| शिर्डी विमानतळाकरिता नवीन एकात्मिक टर्मिनल इमारतीची उभारणीचे काम, इतर कामे तसेच अतिरिक्त जमिनीच्या भूसंपादनासाठी | शिर्डी विमानतळ | रू.४३६.०० | रू.१९.०० |
| रत्नागिरी विमानतळाकरिता संरक्षक भिंत उभारणे, नवीन प्रवासी टर्मिनल इमारत बांधणे, पार्किंग ॲप्रॉन, लिंक टॅक्सीवे व अंतर्गत रस्ते बांधणे इ. | रत्नागिरी विमानतळ | रू.९२.४० | रू.८.०० |
| RCS योजनेअंतर्गत समाविष्ट असलेल्या राज्यातील विमानतळांसाठी लागणाऱ्या विविध सोयीसुविधा देण्यासाठी लागणारा निधी. | RCS योजनेअंतर्गत विमानतळे | रू.१३२.६७ | रू.२९.१३ |
| औरंगाबाद विमानतळासाठी प्राथमिक भूसंपादनासाठी | औरंगाबाद विमानतळ | रू.३२.६० | रू.३४.६८ |
| जळगाव विमानतळ | जळगाव विमानतळ | रू.३४.९१ | रू.९.१९ |
| एकूण | | | रू.१००.०० |

२. उपरोक्त खर्च " मागणी क्रमांक ए-७, ३०५३ नागरी विमानचालन, ०२ विमानतळ, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (००) (०२) विमानतळाच्या विकासाकरिता महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस सहायक अनुदान ( कार्यक्रम ), ( ३०५३ ०१६४ ) ३१ सहायक अनुदाने ( वेतनेतर ), " या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. बिम्स प्रणालीवर निधी वितरणासाठी सह सचिव / उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (विमानचालन, मंत्रालय, मुंबई (A००३६)) हे नियंत्रक अधिकारी म्हणून नियुक्त करण्यात आले आहे. सबब, सदर निधी बिम्स प्रणालीवर सह सचिव/उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (विमानचालन), मंत्रालय, मुंबई यांना वितरीत करण्यात यावा. संचालनालय स्तरावर देयके अदा करण्यासाठी उपसंचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. वितरीत करण्यात येत असलेला सदरहू निधी सशर्त असून ज्या विकासकामांसाठी वितरीत करण्यात आला आहे, त्याच कामांसाठी तो दि.३१ मार्च २०२५ पूर्वी खर्ची पडेल याची खबरदारी महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीने घ्यावी. तसेच, वितरीत निधी PLA अथवा बँक खात्यात जमा न करता विहीत प्रयोजनातूनच खर्च होण्याची खातरजमा कंपनीने करावी व खर्च करण्यात आलेल्या

निधीबाबत वेळोवेळी आढावा घेऊन विहीत कालावधीत खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तसेच महालेखापाल कार्यालयास सादर करावे.

५. अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करून दिलेला निधी कोषागारातून आहरीत करण्यापूर्वी तसेच, खर्च करताना राज्य शासनाची कार्यनियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील तरतुदी तसेच, वित्त विभागाचे, शासन परिपत्रक क्र.अर्थसं २०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.१ एप्रिल, २०२४, क्र.अर्थसं २०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५ जुलै, २०२४ व क्र.अर्थसं २०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.१२ फेब्रुवारी, २०२५ मधील मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

६. सदर शासन ज्ञापन वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.अनौ.सं.क्र. ८२/व्यय-४, दि.२१.०२.२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०२५०३०४१५०८३०९१०७ असा आहे. हे आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

SHILPA ABHAY CHACHAD

Digitally signed by SHILPA ABHAY CHACHAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT,
2.5.4.20=3f0b1454eadcb46569c38e868a5b441a8a32b442036ce5c8ffbed5e862cc4202, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=15FE38A4E995535864D6D7BC4CB39F75BB8A6906B9DA526DCB4921B96EE9B6EF, cn=SHILPA ABHAY CHACHAD
Date: 2025.03.04 15:10:28 +05'30'

**( शिल्पा चाचड )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्या., मुंबई
२. संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई.
३. उपसंचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई.
४. महालेखापाल, ( लेखा परिक्षा)/ (लेखा अनुज्ञेयता ),महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परीक्षक, मुंबई.
७. कक्ष अधिकारी, कार्या-१४४३, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. कक्ष अधिकारी, कार्या-व्यय ४, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. कक्ष अधिकारी, कार्या-२५, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.निवडनस्ती (कार्य.२८-अ)